**<u>ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम</u>**
गडचिरोली जिल्ह्यातील कंत्राटी अभियंत्यांच्या मानधनाबाबत ...

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो-११०९/प्र.क्र.११५/पापु-०७**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक : १६ मे,२०११**

**वाचा:** शासन निर्णय,पा.पु.व स्व.वि क्रमांक ग्रापाधो-११०९/प्र.क्र.११५/पापु-०७ दि. ०९ सप्टेंबर, २००९

**<u>प्रस्तावना :</u>**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम तसेच सर्व बाह्य सहाय्यीत प्रकल्पांतर्गत राबविण्यात येणा-या ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीसाठी तांत्रिक सेवा पुरवठादारांऐवजी करार पद्धतीने कंत्राटी कनिष्ठ अभियंत्यांची सेवा घेण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे, त्याचप्रमाणे कंत्राटी अभियंत्यांच्या नेमणूकीसंदर्भात कार्यपद्धती देखील विहित करण्यात आलेली आहे.

२. कंत्राटी पद्धतीने नियुक्त करावयाच्या कनिष्ठ अभियंत्यांची शैक्षणिक अर्हता व त्यानुसार त्यांना द्यावयाचे एकत्रित ठोक मानधन पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात आले आहे:

| कनिष्ठ अभियंता | मासिक एकत्रित ठोक मानधन |
|---|---|
| अ) स्थापत्य अभियांत्रिकी पदविका धारक | रु.१०,०००/- (रुपये दहा हजार फक्त) |
| ब) स्थापत्य अभियांत्रिकी पदवी धारक | रु.१२,०००/- (रुपये बारा हजार फक्त) |

३. राज्यातील आदिवासी व नक्षग्रस्त भाग असलेल्या गडचिरोली जिल्ह्यामध्ये ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी कंत्राटी अंभियंत्यांच्या नियुक्ती करीता पुरेशा प्रमाणात उमेदवार उपलब्ध होत नाहीत व त्यामुळे त्या जिल्ह्यातील ग्रामिण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीवर प्रतिकूल परिणाम झाला आहे,असे शासनाच्या निदर्शनास आणण्यात आले आहे.

नक्षलग्रस्त व आदिवासी क्षेत्रातील बिकट परिस्थितीत शासनाच्या योजनांची प्रभावीपणे अंमलबजावणी करणा-या शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना त्या भागात काम करतांना येणा-या विविध अडचणींचा विचार करुन तसेच नक्षलग्रस्त / संवेदनशील भागात जिविताची सुरक्षितता इत्यादी बाबी लक्षात घेऊन त्यांना काही प्रोत्साहनपर सवलती शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.टिआरएफ-२०००/प्र.क्र.३/बारा, दि.६/८/२००२ अन्वये देण्यात आल्या आहेत.त्याच धर्तीवर आदिवासी व नक्षग्रस्त भाग असलेल्या गडचिरोली जिल्ह्यांमध्ये काम करण्यास उमेदवारांना प्रोत्साहन मिळावे यासाठी या जिल्ह्यामध्ये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीसाठी नियुक्त करावयाच्या कंत्राटी अभियंत्यांच्या मानधनात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

राज्याचा आदिवासी व नक्षलग्रस्त भाग असलेल्या गडचिरोली जिल्ह्यामध्ये, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत, राष्ट्रीय ग्रामीण पेय जल कार्यक्रम तसेच सर्व बाह्य अर्थसहाय्यीत प्रकल्पांतर्गत राबविण्यात येणा-या ग्रामीण पाणी पुरवठा

योजनांच्या अंमलबजावणीसाठी नियुक्त करावयाच्या कंत्राटी अभियंत्यांच्या मानधनात वाढ करुन ते खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे-

| कनिष्ठ अभियंता | मासिक एकत्रित ठोक मानधन |
|---|---|
| अ) स्थापत्य अभियांत्रिकी पदविका धारक | रु.१५,०००/- (रुपये पंधरा हजार फक्त) |
| ब) स्थापत्य अभियांत्रिकी पदवी धारक | रु.१८,०००/- (रुपये अठरा हजार फक्त) |

वरील मासिक एकत्रित ठोक मानधनाव्यतिक्त या कंत्राटी अभियंत्यांना त्यांनी प्रत्यक्ष केलेल्या प्रवासाकरिता (या अभियंत्यांनी स्वतःचे वाहन वापरले तरीही) नियमानुसार कनिष्ठ अभियंता या पदासाठी अनुज्ञेय असलेला प्रवास व दैनंदिन भत्ता अनुज्ञेय राहील. त्याचप्रमाणे या अभियंत्यांना भ्रमण दूरध्वनी (Mobile Phone) किंवा इंटरनेट वापर या करिता मासिक रु.१०००/- (रु.एक हजार फक्त) इतकी रक्कम देण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०५१६१५३२२२००१ असा आहे.

सही/-

**( प्राजक्ता लवंगारे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव
विभागीय आयुक्त (सर्व)
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
सर्व प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
सर्व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद
महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नाशिक, पुणे,औरंगाबाद, अमरावती व नागपूर
सर्व कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई
मंत्रालयातील इतर सर्व विभाग,
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने
निवडनस्ती, कार्यासन क्रमांक पापु-०७